राष्ट्रीय किटकजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमांर्तगत किटकनाशके व अळीनाशके खरेदी करण्यासाठी सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन पुरकपत्र क्रमांक-:खरेदी-२०१८/३७६/प्र.क्र.२२५/आरोग्य-८**
नवीन मंत्रालय ,गोकुळदास तेजपाल रुग्णालय कॉम्पलेक्स बिल्डींग,
१० वा मजला मुंबई-४००००१.
दिनांक- ०९ जानेवारी, २०२०.

**वाचा:-** १) शासन निर्णय,सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.खरेदी-२०१८/प्र.क्र.२२५/आरोग्य -८, दि.२२.११.२०१८.

**प्रस्तावना–:**

राष्ट्रीय किटकजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमांर्तगत किटकनाशके/अळीनाशके खरेदी करण्यासाठी दिनांक २२.११.२०१८ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार जाहिर निविदेव्दारे निविदा (TENDER) प्रक्रिया राबविण्यात आली असून, सदर प्रक्रीया सन २०१९-२० मध्ये पुर्ण झाली आहे. सदर प्रकियेस एक वर्षाचा कालावधी संपुष्टात आल्याने उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय दिनांक १.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक २.१३ मध्ये प्रशासकीय मान्यतेचे आदेश मान्यतेच्या दिनांकापासून एक वर्षापर्यंतच ग्राहय राहतील, एक वर्षाच्या कालावधीनंतर प्रशासकीय मान्यतेचे नविन आदेश काढण्यात यावेत असा नियम आहे, त्यानुसार लेखाशिर्ष -२२१०५१५७ व २२१०५१६६ मधून सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील अनुदानातून खर्च करण्यासाठी सुधारीत प्रशासकिय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन पूरकपत्र :-**

राष्ट्रीय किटकजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमांर्तगत किटकनाशके/अळीनाशके खरेदी करण्यासाठी रुपये ४,६६,७८,१६८/- (रुपये चार कोटी सहासष्ट लाख अठ्ठ्यात्तर हजार एकशे अडुसष्ट फक्त) इतका खर्च सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यासाठी शासन निर्णय दिनांक २२.११.२०१८ अन्वये प्रशासकीय मान्यता दिलेली असून, त्यानुसार खरेदी प्रक्रिया पूर्ण झाली आहे. तथापि, प्रशासकीय मान्यतेचा एक वर्षाचा कालावधी संपुष्टात आल्याने संदर्भाधीन दि.२२/११/२०१८ च्या प्रशासकीय मान्यतेनुसार केलेल्या खरेदीचा खर्च सन २०१९-२० मध्ये या प्रयोजनार्थ संबंधित लेखाशिर्षात

बी.डी.एस.प्रणालीवर उपलब्ध असलेल्या व वितरीत केलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच खर्च करावा, या अटींच्या व उक्त शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अनुक्रमांक-४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ भाग अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे,

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१०९१५५८४६६३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jamsher Samsher Tadavi

Digitally signed by Jamsher Samsher Tadavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc70f5be589b29aaa447f5cdd15c9826781de5daa02a4ecf339fb1d0559ab9d6, serialNumber=a92e218ede7b7c9acaa3bea18f6d46feab420783e12f260504f402b54de8c476, cn=Jamsher Samsher Tadavi
Date: 2020.01.09 15:58:16 +05'30'

**(ज.स.तडवी)**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. परेल, मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११) निवडनस्ती (आरोग्य-८)